**श्री.शेख म.इर्शाद म. शफी यांना सहायक भूभौतिक तज्ञ (गट-ब) या पदी तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः आपना १२१२/ प्रक्र. ४६३/पापु-१५

गो. ते. रुग्णालय आवार, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग,मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: २६ ऑगस्ट, २०१४

**शासन आदेश :**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूभौतिकतज्ञ (गट-क) पदी कार्यरत असलेले श्री. शेख म. इर्शाद म. शफी यांना सहायक भूभौतिक तज्ञ (गट-ब) या पदी रु. ९३००-३४८०० ग्रेड पे रुपये ४५०० या वेतनश्रेणीतील पदोन्नती कोटयात तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

२. श्री. शेख म. इर्शाद म. शफी यांनी सहायक भूभौतिक तज्ञ, गट-ब या पदोन्नतीच्या पदावर त्यांचा वेतन निश्चितीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एका महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची पदोन्नतीच्या पदावरील वेतन निश्चिती पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील ११ (१) नुसार केली जाईल.

३.सदर पदोन्नती मा. मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४.श्री. शेख म. इर्शाद म. शफी यांची पदस्थापना उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती येथील सहायक भूभौतिक तज्ञ या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८२६१२११२४०९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.08.26 15:01:05 +05'30'

( प्रमोद गि. कानडे )
अवर सचिव

प्रति,
संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता)
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद / अमरावती
उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद./ अमरावती.
श्री. शेख म. इर्शाद म. शफी, संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या मार्फत.
निवडनस्ती (पापु-१५)